**अधिव्याख्याता, शासकीय तंत्रनिकेतन, महाराष्ट्र तंत्रनिकेतन शिक्षक सेवा गट-अ यांच्या बदलीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. ससेनि-३११७/प्र.क्र.१०३/१७/तांशि-७**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ०१ ऑगस्ट, २०१८.

वाचा : १) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय यांचे पत्र क्र.४अ/आस्था/२०१७/६४५, दि.११/८/२०१७ व दि. १२/०७/२०१८ रोजीचा ई-मेल.
२) श्रीमती अश्विनी माळी यांचे दि. ०४/१०/२०१७ रोजीचे निवेदन.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम २००५ मधील तरतुदीनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने तंत्रशिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील शासकीय तंत्रनिकेतनातील खालील विवरणपत्रात नमूद अधिव्याख्याता यांची बदली करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | अध्यापकाचे नाव व पदनाम | कार्यरत संस्था | बदली करण्यात आलेली संस्था | अभिप्राय |
|---|---|---|---|---|
| १ | श्री.आशिष सुभाष वायचळ, अधिव्याख्याता, विद्युत अभियांत्रिकी. | शासकीय तंत्रनिकेतन, मुर्तिजापूर. | शासकीय तंत्रनिकेतन, सोलापूर. | विनंती बदली |
| २ | श्रीमती अश्विनी नागनाथ माळी, अधिव्याख्याता, विद्युत अभियांत्रिकी. | शासकीय तंत्रनिकेतन,अहमदनगर. | शासकीय तंत्रनिकेतन,सोलापूर. | विनंती बदली |

२. बदलीच्या आदेशाची अंमलबजावणी तात्काळ व कार्यक्षमरित्या होण्याकरीता खालील सुचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

१) आदेश तात्काळ अंमलात येतील. उपरोक्त बदल्या विनंतीनुसार करण्यात आल्या असल्याने त्यांना पदग्रहण अवधी, प्रवास भत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय राहणार नाही.
२) बदलीबाबतचे आदेश प्राप्त झाल्यानंतर संबंधित अधिव्याख्यात्यांनी सध्या कार्यरत असलेल्या संस्थेतून तात्काळ त्यांची बदली नंतरची पदस्थापना केलेल्या संस्थेत रुजु व्हावे. तसेच सर्व संस्थाप्रमुखांनी पर्यायी अधिव्याख्याता हजर होण्याची वाट न पाहता बदली झालेल्या अधिव्याख्यात्यांना तात्काळ कार्यमुक्त करावे.
३) बदली झालेले अधिव्याख्याते त्यांच्या संबंधित संस्थेकडून कार्यमुक्त होऊन रुजु होण्यासाठी आल्यानंतर त्यांना विनाविलंब रुजु करुन घ्यावे.
४) बदली झालेल्या अधिव्याख्यात्यांची कोणतीही रजा प्रशासकीय विभागाच्या पूर्वमान्यतेशिवाय मंजूर करण्यात येऊ नये.
५) हे आदेश तात्काळ अमलात येतील. बदली झालेले अधिकारी कार्यमुक्त होऊन बदलीच्या ठिकाणी रूजु झाल्याबाबतची माहिती संचालनालयाने या विभागास कळवावी.

०३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०१८०८०११६११०३५८०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sudhir Jaya Shetty

Digitally signed by Sudhir Jaya Shetty
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=72ea277025fdf5a4898b244953b82406eea05963bc456f1e1e8621e5917d8305, serialNumber=e9d37d499a521b728aeb3dc8ec38b759420308b9fd7816002b4af0ffbf1111d7, cn=Sudhir Jaya Shetty
Date: 2018.08.01 16:16:12 +05'30'

**( सुधीर जया शेट्टी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

संबंधित अधिव्याख्याते (संबंधित संस्थेमार्फत)

**प्रत :**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. मा. मंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा. राज्यमंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. सचिव, उच्च व तंत्रशिक्षण यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई,
५. संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
६. सहसंचालक, तंत्रशिक्षण विभागीय कार्यालय,नाशिक/पुणे/ अमरावती,
७. प्राचार्य, शासकीय तंत्रनिकेतन, मुर्तिजापूर/अहमदनगर/सोलापूर, (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत),
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र १ / २, मुंबई/ नागपूर,
९. जिल्हा कोषागार अधिकारी, अकोला/अहमदनगर/सोलापूर,
१०. निवड नस्ती-तांशि-७.